राज्यात हळद संशोधन व प्रक्रिया धोरण
निश्चित करण्यासाठी "अभ्यास समिती"
गठीत करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**कृषि,पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्र. हसंप्र-२०२०/प्र.क्र. १६५/९-अे**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२,
दिनांक : ७ सप्टेंबर, २०२०

**प्रस्तावना :-**

राज्यातील हिंगोली, नांदेड, परभणी, वाशिम, यवतमाळ, बुलढाणा, सांगली, सातारा, चंद्रपूर इत्यादी जिल्ह्यांमध्ये हळदीचे पिक मोठ्या प्रमाणावर घेतले जात असून प्रक्रिया, साठवणूक व विक्रीची पुरेशी सुविधा उपलब्ध नसल्याने राज्यातील हळद इतर राज्यामध्ये मोठ्या प्रमाणात निर्यात होते. हळदीच्या लागवडीपासून प्रक्रिया व विक्रीपर्यंत आवश्यक त्या सुविधा उपलब्ध झाल्यास जिल्ह्यातील हळद उत्पादक शेतकऱ्यांना त्याचा मोठा फायदा होऊन उत्पादनात वाढ होण्यास मदत होईल. हळद लागवडीपासून प्रक्रिया व विक्रीपर्यंत शेतकऱ्यांना येणाऱ्या अडचणी विचारात घेता हळद संशोधन व प्रक्रिया धोरण निश्चित करण्यासाठी शासनास सल्ला देण्यासाठी एक अभ्यास समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय:-**

हळद पिकाच्या लागवडीपासून प्रक्रिया व विक्री पर्यंत शेतकऱ्यांना येणाऱ्या अडचणी विचारात घेऊन हळद संशोधन व प्रक्रिया धोरण निश्चित करण्यासाठी मा. श्री. हेमंत पाटील, लोकसभा सदस्य, हिंगोली लोकसभा मतदारसंघ यांच्या अध्यक्षतेखाली पुढीलप्रमाणे 'अभ्यास समिती' गठीत करण्यात येत आहे.

| अ.क्र. | नाव | पदनाम |
|---|---|---|
| १ | मा. श्री. हेमंत पाटील, लोकसभा सदस्य, हिंगोली लोकसभा मतदारसंघ | अध्यक्ष |
| २ | आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे | सदस्य |
| ३ | संशोधन संचालक, व.ना.म. कृषि विद्यापीठ, परभणी | सदस्य |
| ४ | संशोधन संचालक, बा.सा.को. कृषि विद्यापीठ, दापोली | सदस्य |
| ५ | संशोधन संचालक, म.फु. कृषि विद्यापीठ, राहुरी | सदस्य |
| ६ | उपसंचालक/सदस्य स्पाईसेस बोर्ड, वाशी | सदस्य |
| ७ | हळद आयात/निर्यात व्यापार संघाचे प्रतिनिधी | सदस्य |
| ८ | महाराष्ट्र कृषि उद्योग महामंडळ/ महाराष्ट्र राज्य औद्योगिक विकास महामंडळ प्रतिनिधी | सदस्य |
| ९ | संचालक पणन मंडळ | सदस्य |
| १० | अन्न व औषध प्रशासन प्रतिनिधी | सदस्य |
| ११ | हळद उत्पादक शेतकरी २ (दोन) | सदस्य |
| १२ | हळद उत्पादक/प्रक्रिया - शेतकरी उत्पादक कंपनी २ (दोन) | सदस्य |
| १३ | संचालक (फलोत्पादन), कृषि आयुक्तालय, पुणे | सदस्य सचिव |

२. समितीने राज्यातील हळद फळपिकाशी संबंधीत शेतकरी, उद्योजक यांचेशी संपर्क साधून त्यांच्या प्रत्यक्ष तसेच लेखी स्वरुपात समस्या मागवून त्या समस्यांच्या अनुषंगाने सखोल चर्चा करुन त्यावर काय उपाययोजना करता येतील याबाबत आपला अहवाल तयार करावा व आपल्या स्वयंस्पष्ट अभिप्रायासह दोन महिन्यात शासनास सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००९०७१२३९१७४९०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Ashok Maroti Atram

Digitally signed by Ashok Maroti Atram
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e212845163abd708717bb4bef92b6886b147679a5af5a494e268689ab8d696dd, serialNumber=5f7eca1f400d866ea34324cea1a547aa04f0da0794a00bee126e8678172a15c5, cn=Ashok Maroti Atram
Date: 2020.09.07 12:41:36 +05'30'

**(अशोक आत्राम)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) मा. मंत्री (फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई -३२
२) मा.राज्यमंत्री (फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई -३२
३) मा. श्री. हेमंत पाटील, लोकसभा सदस्य (हिंगोली लोकसभा मतदारसंघ) तथा अध्यक्ष, हळद संशोधन व प्रक्रिया धोरण अभ्यास समिती.
४) सचिव (कृषि) यांचे स्वीय सहाय्यक,मंत्रालय, मुंबई -३२
५) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्त कार्यालय, महाराष्ट्र राज्य,पुणे.
६) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे
७) जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी, हिंगोली.
८) सर्व समिती सदस्य, हळद संशोधन व प्रक्रिया धोरण अभ्यास समिती
९) कार्यासन ९-अे, संग्रहार्थ.